**धर्मादाय प्रयोजनासाठीच्या निधीकरिता मुख्यमंत्र्यांच्या देणग्या सन २०१८-१९ च्या अर्थसंकल्पातील तरतूद भारतीय रिझर्व्ह बँक, मुंबई मधील स्वीय प्रपंजी (P.L.A.) लेख्यात जमा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : सीसीएफ-२०१८/प्र.क्र.१०७/२०१८/२५**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक : १३ जून, २०१८

संदर्भ : १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक सीसीएफ-२०१४/प्र.क्र.८८/२०१४/२५, दि.४ मार्च, २०१७

२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.२ एप्रिल, २०१८

३) सामान्य प्रशासन विभाग, बीयुडी २०१८/प्र.क्र.७०/२०१८/२५, दि.४ एप्रिल, २०१८

**शासन निर्णय :-**

सन २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठी मुख्यमंत्री धर्मादाय देणगी निधीकरिता "मागणी क्रमांक ए-५, प्रधानशीर्ष-२२५०-इतर सामाजिक सेवा-१०१-धर्मादाय प्रयोजनासाठी देणग्या (००) (०१) धर्मादाय प्रयोजनासाठीच्या निधीकरिता मुख्यमंत्र्यांच्या देणग्या (संकेतांक क्रमांक २२५० ००१२) अनिवार्य (दत्तमत) उद्दिष्ट -५०- इतर खर्च" या लेखाशीर्षाखाली रुपये २५ कोटी (रुपये पंचवीस कोटी फक्त) इतकी तरतूद करण्यात आली आहे. सदर तरतुदीपैकी वित्त विभागाच्या अर्थसं-२०१८/प्र.क्र. ६९/अर्थ-३ दि.२ एप्रिल, २०१८ च्या परिपत्रकान्वये उपरोक्त लेखाशीर्षाखाली ७० टक्केच्या मर्यादेत रुपये १७.५० कोटी (रुपये सतरा कोटी, पन्नास लाख फक्त) अर्थसंकल्पीय वितरणप्रणालीवर उपलब्ध करून देण्यात आले आहेत.

२. सदर रुपये १७.५० कोटी (रुपये सतरा कोटी, पन्नास लाख फक्त) इतकी रक्कम भारतीय रिझर्व्ह बँक, मुंबई येथील मुख्यमंत्री धर्मादाय देणगी निधीसाठी प्रधान सचिव व मुख्य राजशिष्टाचार अधिकारी यांच्या नावे असलेल्या स्वीय प्रपंजी लेखा खाते (P.L.A.) क्रमांक ६१८४०३६००६

(०१५१४५०१०८९) मध्ये जमा करण्यास याद्वारे श्री.अ.वि.कदम, अवर सचिव यांना “आहरण व संवितरण अधिकारी” तसेच श्री.सो.ना.बागुल, सह सचिव यांना “नियंत्रक अधिकारी” घोषित करण्यात येत आहे.

३. उपरोक्त दर्शविलेली रुपये १७.५० कोटी इतकी रक्कम अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांनी “मागणी क्रमांक ए-५, प्रधानशीर्ष -२२५०-इतर सामाजिक सेवा -१०१-धर्मादाय प्रयोजनासाठी देणग्या (००) (०१) धर्मादाय प्रयोजनासाठीच्या निधीकरिता मुख्यमंत्र्यांच्या देणग्या (संकेतांक क्रमांक २२५० ००१२) अनिवार्य (दत्तमत) उद्दिष्ट -५०-इतर खर्च” या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ या वर्षामध्ये खर्ची दाखवून (के) ठेवी व आगाऊ रकमा (बी) बिनव्याजी ठेवी (८४४३), नागरी ठेवी (१०६) वैयक्तिक ठेवी (८४४३५०८४) या लेखाशीर्षाखाली जमा दाखवावी व सदर रकमेचा धनादेश “Chief Minister॰s Donations For Charitable Purposes Fund” या नावाने काढण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१८०६१३१२२१३५७६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Arun V Kadam
Date: 2018.06.13 17:03:48 +05'30'

(अ. वि. कदम)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
२) महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (डीसी-४)
३) महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (एसी-४)
४) महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (लेखा परिक्षा)
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (दोन प्रती)
६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
७) वित्त विभाग/अर्थसंकल्प १४/अर्थोपाय कक्ष/व्यय-४, मुंबई
८) निवड नस्ती.